**पनवेल शहर महानगरपालिकेमध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या रायगड जिल्ह्यातील २९ गावांमधील तत्कालीन ग्रामपंचायतींमध्ये सेवारत असलेल्या कर्मचाऱ्यांचे महानगरपालिका सेवेत समावेशन करण्यासंदर्भात धोरण निश्चित करण्याकरीता समितीचे गठन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः- एमसीओ-२०१७/प्र.क्र.५७/नवि-१४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांकः- २७ फेब्रुवारी, २०१७**

**वाचा -** १) शासन अधिसूचना, नगर विकास विभाग, क्र.पनप-२९१४/व्हीआयपी सं.क्र.३०१/प्र.क्र.३५४/नवि-२३, दि.२६ सप्टेंबर, २०१६.
२) शासन अधिसूचना, ग्राम विकास विभाग, क्र.झेडपीबी-२०१६/ प्र.क्र.४६/१/पंरा-५, दि.२९ सप्टेंबर, २०१६
३) आयुक्त तथा प्रशासक, पनवेल शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.पशम/१०३८/२०१७, दि.०९ फेब्रुवारी, २०१७.

**प्रस्तावनाः-**

उपरोक्त वाचा क्र.१ येथील शासन अधिसूचनेद्वारे पनवेल नगरपरिषदेचे संपूर्ण क्षेत्र आणि रायगड जिल्ह्यातील २९ महसूली गावांच्या संपूर्ण क्षेत्राचा समावेश करुन पनवेल शहर महानगरपालिका घटीत करण्यात आली आहे. उपरोक्त वाचा क्र.२ येथील शासन अधिसूचनेद्वारे रायगड जिल्ह्यातील २९ महसूली गावे दि.०१/१०/२०१६ पासून रायगड जिल्ह्यातून वगळून या गावांची क्षेत्रे उक्त दिनांकापासून गावाचा भाग राहणार नाहीत, असे जाहीर करण्यात आले असून या गावांचे क्षेत्र पनवेल शहर महानगरपालिकेकडे हस्तांतरीत करण्यात आले आहे. या २९ गावांच्या तत्कालीन २३ ग्रामपंचायतींमध्ये तेव्हा सेवारत असलेल्या कर्मचाऱ्यांचे पनवेल शहर महानगरपालिकेच्या सेवेत समावेशन करण्याबाबत धोरण ठरविण्याच्या दृष्टीने विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची विनंती उपरोक्त वाचा क्र.३ येथील पत्रान्वये आयुक्त तथा प्रशासक, पनवेल शहर महानगरपालिका यांनी केली आहे.

**शासन परिपत्रकः-**

पनवेल शहर महानगरपालिकेमध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या रायगड जिल्ह्यातील २९ गावांच्या २३ ग्रामपंचायतींमध्ये सेवारत असलेल्या कर्मचाऱ्यांचे पनवेल शहर महानगरपालिकेमध्ये समावेशन करण्याबाबत धोरण निश्चित करण्याकरीता पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहेः-

| | |
|---|---|
| विभागीय आयुक्त, कोकण विभाग | अध्यक्ष |
| आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय | सदस्य |
| मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड | सदस्य |
| सह सचिव, नगर विकास विभाग (नवि-२) | सदस्य |
| आयुक्त तथा प्रशासक, पनवेल शहर महानगरपालिका | सदस्य सचिव |

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०२२७१४४५२६५५२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.02.27 14:46:21 +05'30'

**( ज. ना. पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
२) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी मुंबई.
३) आयुक्त तथा प्रशासक, पनवेल शहर महानगरपालिका, जिल्हा रायगड.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड.
५) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
६) निवडनस्ती.